केंद्र पुरस्कृत शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम योजनेकरिता सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त निधी (केंद्र हिस्सा) लेखाशिर्ष क्र. **(२४०१ A५३९)** व त्यास समरुप राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ A५४८) वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र.क्र.११ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - ३१ ऑगस्ट, २०१७.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७ /प्र.क्र.६८ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१७.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.७५ / अर्थ-३, दि. १८.०४.२०१७.
३) वि. वि, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७ /प्र.क्र.९४ / अर्थ-३, दि. ३०.०६.२०१७
४) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक १-७/२०१४-RFS-III, दिनांक १५ जून, २०१७.
५) कृषि व पदुम विभाग, नस्ती क्र. शाशेअ- २०१७ / प्र. क्र. १५९ / भाग-२/१७/४-अे.

**शासन निर्णय-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामानबदल शाश्वत शेतीसंमिश्रण प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी मागणी क्र. टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामानबदल शाश्वत शेतीसंमियंत्रण प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना ६० टक्के केंद्र हिस्सा ) लेखाशिर्ष २४०१ A५३९, ३३-अर्थसहाय्य याखाली रु.२४४.९४ लाख इतका निधी तर (०१) (२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास आणि हवामानबदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व आंतरजाल कार्यक्रम (कें.पु.यो. ४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A५४८, ३३-अर्थसहाय्य याखाली रु.१६३.३० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

केंद्र शासनाने सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामानबदल शाश्वत शेतीसंमिश्रण प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रमांतर्गत रु.११७.५० लाख इतका निधी वितरीत केला आहे. त्यानुषंगाने कृषि व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र. ५ येथील प्रस्तावास अनुसरुन टी-५, २४०१ पीक संवर्धन, ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामानबदल शाश्वत शेतीसंमियंत्रण प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंद्र पुरस्कृत योजना ६० टक्के केंद्र हिस्सा ) लेखाशिर्ष २४०१ A५३९, ३३- अर्थसहाय्य याखाली रु. ११७.५० लाख ( अक्षरी रुपये एक कोटी सतरा लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी तर त्यास समरुप (०१) (२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान अवर्षण क्षेत्र विकास आणि हवामानबदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व आंतरजाल कार्यक्रम (कें.पु.यो. ४० टक्के राज्य हिस्सा) लेखाशिर्ष २४०१ A५४८, ३३-अर्थसहाय्य याखाली रु.७८.३३ लाख ( अक्षरी रुपये अठयाहत्तर लाख तेहतीस हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग / नियंत्रक अधिकारी म्हणून सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास विभाग,

मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ व क्रमांक २ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २७१/ अर्थोपाय, दि. २१-०६-२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२९१२५३३९४०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, serialNumber=344de3ff07b9439dd11caf728255a5eb0a0dd495ef82f989931088637d8211c0, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2017.08.31 13:24:27 +05'30'

**किरण कि.पवार**
कार्यासन अधिकारी.

**प्रत,**

१. प्रधान सचिव ( कृषि ) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, कृषि, महाराष्ट्र राज्य.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.

५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.

६. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.

७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

९. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.